मंत्रालय उपाहारगृहामार्फत पतविक्री सवलती अंतर्गत पुरविण्यात आलेल्या खाद्यपेयांची देयके.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग[उपाहारगृहे]
परिपत्रक क्र. ओएसबी-१०८९/पवि/मंउका,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- २६ डिसेंबर, १९८९

संदर्भ:- १] शासकीय परिपत्रक क्र. जीएडी/सीएनटी/रिकव्हरी/ॲरियस/१९६६ दिनांक. ३१ जानेवारी, १९६६.
२] शासकीय परिपत्रक क्र. ओएसबी-१०८८/थपवि/मंउका, दिनांक. १ जून, १९८८

## परिपत्रक

मंत्रालय उपाहारगृहामार्फत मुख्यमंत्र्यांचे सचिवालय, मंत्री व राज्यमंत्री यांची कार्यालये तसेच मंत्रालयीन विभाग व मंत्रालयात होणाऱ्या उच्चस्तरीय बैठकांच्या मागणीनुसार खाद्यपेयांचा पुरवठा करण्यात येतो. मंत्रालयीन विभाग/संलग्न कार्यालयांना कोषागारातून रक्कम काढण्यासाठी विहित कार्यपध्दती अनुसरावी लागत असल्याने उपाहारगृहाने पुरविलेल्या खाद्यपेयांच्या देयकांची रक्कम वेळीच देणे त्यांना शक्य होत नाही. केवळ त्यामुळे गैरसोय होऊ नये म्हणून संबंधित विभाग/कार्यालयांना उधार विक्री सवलत पूर्वीपासून देण्यात येत आहे.

२. संदर्भाधीन परिपत्रकान्वये शासकीय विभाग/कार्यालयांनी उपाहारगृहाची देयके न चुकता दोन महिन्यांच्या आत भरणा करावी अशा सूचना देण्यात आलेल्या आहेत. तथापि, असे निदर्शनास आले आहे की, अनेक मंत्रालयीन विभाग/कार्यालयांनी उपाहारगृहाच्या खाद्यपेयासंबंधीची देयके अजूनही अदा केलेली नाहीत. अशा प्रकारे उधार विक्रीपोटी थकित असलेल्या रकमेच्या संबंधात महालेखापाल, मुंबई यांच्याकडून लेखापरिक्षणाच्या वेळी वारंवार आक्षेप घेण्यात येतात. तसेच उपाहारगृहास येणे असलेली रक्कम फार काल प्रलंबित राहिल्याने त्याचाही परिणाम उपाहारगृहाच्या प्रपत्र लेख्यावर होतो. अशा थकित देयकांच्या संदर्भात संबंधित विभागाकडे/कार्यालयाकडे स्मरणपत्रे व अर्धशासकीय पत्रान्वये पाठपुरावा करण्यात येतो. तथापि, त्या संदर्भात काही विभागांनी मूळ देयके मिळत नसल्याने देयकांच्या प्रती उपलब्ध करून द्याव्यात असे कळविले आहे. तर काही विभागांकडून त्यासंदर्भात काहीच प्रतिसाद मिळालेला नाही. या बाबी विचारात घेऊन, उपाहारगृहाची देयके फार काळ थकित राहू नयेत, तसेच पतविक्रीच्या थकित देयकांच्या संदर्भात परिणामकारकरित्या पाठपुरावा करणे सोईचे व्हावे यासाठी खालील पध्दत ठरविण्यात येत आहे.

१] प्रचलित पध्दतीनुसार उपाहारगृहाची पतविक्री देयके मागणी करणाऱ्या अधिकाऱ्यांकडे दिली जातात. तथापि, आता ही देयके संबंधित विभागांच्या नोंदणी शाखेत देण्यात येतील.

२] पतविक्री सेवेअंतर्गत खाद्यपेयांच्या पुरवठ्यासाठी मागणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी मागणीपत्रात पूर्ण नांव, पदनाम, विभाग, खोली क्रमांक इत्यादी तपशिल पूर्णपणे देणे आवश्यक आहे. मागणीपत्रातील माहिती अपूर्ण असल्यास मागणीपत्रे उपाहारगृहामध्ये स्विकारले जाणार नाही.

३] मंत्रालयीन विभागांनी त्यांना उपाहारगृहाच्या देयकांचा मागोवा घेणे सोईचे व्हावे यासाठी मागणीपत्रे उपाहारगृहाकडे पाठविणे व आलेली देयके अदा करणे यासंबंधीची कार्यवाही शक्यतो एकाच कार्यासनाकडे सोपवावी.

४] मंत्रालयीन विभागातील संबंधित अधिकाऱ्यांनी मंत्रालय उपाहारगृहाच्या पतविक्री देयकांच्या संदर्भात किमान महिन्यातून एकदा आढावा घेऊन प्रलंबित असलेली देयके लवकरात लवकर अदा केली जातील या दृष्टीने कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ ना. दे. कोळी. ]
सह सचिव, महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग[उपाहारगृहे]

प्रति,

१] सर्व मंत्रालयीन विभाग.
२] मंत्रालयातील इतर सर्व कार्यालये.
३] व्यवस्थापक, मंत्रालय उपाहारगृह, मुंबई.
४] व्यवस्थापक, कोकण भवन उपाहारगृह, कोकण भवन, नवी मुंबई.
५] व्यवस्थापक, विधान भवन उपाहारगृह, मुंबई.
६] नवीन प्रशासकीय व कोकण भवन येथील सर्व कार्यालये.
७] विधान मंडळ सचिवालय, मुंबई.
८] निवड फाईल.

-x-x-x-x-x-